**पदव्युत्तर पदविका / पदवी करीता अनधिकृत गैरहजर असलेल्या वैद्यकीय अधिकारी गट-अ यांना क्षेत्रीय स्तरावर रुजू करुन घेण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक आरोग्य विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांकः अनधि-२०२१/प्र.क्र.५४४/सेवा-३**
**गोकुळदास तेजपाल रुग्णालय आवार, संकुल इमारत, १० वा मजला,**
**मंत्रालय, मुंबई-४०० ००१**
**दिनांक:** १६ डिसेंबर,२०२१

**प्रस्तावना:-**

महाराष्ट्र वैद्यकीय व आरोग्य सेवा, गट-अ संवर्गातील सार्वजनिक आरोग्य विभागांतर्गत आरोग्य संस्थांमध्ये कार्यरत काही वैद्यकीय अधिकारी हे विनापरवानगी खाजगीरित्या पदव्युत्तर पदवी / पदविका अभ्यासक्रमासाठी परस्पर निघून जातात. त्यामुळे त्यांच्या प्रदिर्घ कालावधीतील विनापरवानगी गैरहजेरीनंतर परत शासन सेवेत रुजू करुन घेण्याचे अधिकार क्षेत्रिय स्तरावरील कार्यालयांना नाहीत. पदव्युत्तर पदवी / पदविका अभ्यासक्रमाकरीता विनापरवानगी गैरहजर असलेल्या वैद्यकीय अधिकाऱ्यांना क्षेत्रीय स्तरावर रुजू करुन घेता येत नाही. यास्तव, जे वैद्यकीय अधिकारी पुर्वपरवानगीशिवाय गैरहजर राहून खाजगी संस्थेत पदव्युत्तर पदविका / पदवी अभ्यासक्रम पुर्ण करतात अशा विनापरवानगी गैरहजर वैद्यकीय अधिकाऱ्यांना शासन सेवेत पुन्हा रुजू करुन घेण्याचे अधिकार क्षेत्रिय कार्यालयांना देण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**शासन परिपत्रक:-**

सार्वजनिक आरोग्य विभागाच्या अखत्यारितील आरोग्य संस्थांमध्ये विशेष अर्हता प्राप्त विशेषज्ञ वैद्यकीय अधिकाऱ्यांची कमतरता आहे. तसेच आरोग्य सेवा ही बाब अत्यावश्यक सेवेमध्ये मोडत असल्याने विशेषज्ञ वैद्यकीय अधिकाऱ्यांची रिक्त असलेली पदे तातडीने भरणे आवश्यक आहे. दि.२३.०७.२०१९ ते दि.२५.०७.२०१९, दि.३०.०६.२०२१ ते दि.०३.०७.२०२१ व दि.०२.०९.२०२१ ते दि.०६.०९.२०२१ या कालावधीत वैद्यकीय अधिकाऱ्यांची रिक्त पदे नामनिर्देशनाने भरण्यात आली आहेत. तथापि, अद्यापही वैद्यकीय अधिकाऱ्यांची बरीचशी पदे रिक्त आहेत. सदर बाब विचारात घेता, यापुर्वी शासन सेवेत कार्यरत असलेले परंतु पदव्युत्तर पदवी /पदविका अभ्यासक्रमासाठी विनापरवानगी गैरहजर असलेल्या व शासन सेवेत पुन्हा रुजु होण्यास इच्छुक असलेल्या सदर विशेषज्ञ अर्हताधारक वैद्यकीय अधिकाऱ्यांना तातडीने रुजू करुन घेणे आवश्यक आहे. त्याकरीता, आरोग्य सेवा ही अत्यावश्यक बाब असल्यामुळे जे वैद्यकीय अधिकारी पदव्युत्तर पदवी / पदविका अभ्यासक्रमास प्रवेश घेतल्याने, विनापरवानगी गैरहजर आहेत अशा गैरहजर वैद्यकीय अधिकाऱ्यांना तात्काळ रुजू करुन

घेवून, त्यांना त्यांची शैक्षणिक अर्हता व आरोग्य संस्थेचा आकृतीबंध विचारात घेवून ते ज्या परिमंडळात कार्यरत होते त्याच परिमंडळात तातडीने रुजू करुन घेण्याचे अधिकार संबंधित जिल्हा आरोग्य अधिकारी व संबंधित जिल्हा शल्य चिकित्सक यांना प्रदान करण्यात येत आहे. तसेच, **शैक्षणीक कारणाव्यतिरिक्त अन्य कारणास्तव प्रदिर्घ कालावधीसाठी अनधिकृत गैरहजर असलेल्या वैद्यकीय अधिकाऱ्यांना कोणत्याही परिस्थितीत उक्त नमूद अधिकाऱ्यांच्या स्तरावर रुजू करुन घेण्यात येऊ नये**.

४. पदव्युत्तर पदवी / पदविका अभ्यासक्रम पुर्ण करण्यासाठी विनापरवानगी गैरहजर असलेल्या वैद्यकीय अधिकाऱ्यांचा पदव्युत्तर पदवी / पदविका अभ्यासक्रमाचा निकाल लागल्यानंतर ३० दिवसांच्या आत रुजू होण्यासाठी आलेल्या विनापरवानगी गैरहजर वैद्यकीय अधिकाऱ्यांना पुन्हा शासन सेवेत रुजू करुन घेण्यात यावे. तसेच जे पदव्युत्तर पदवी / पदविका अभ्यासक्रम अपूर्ण सोडतील व अनुत्तिर्ण होतील अशा वैद्यकीय अधिकाऱ्यांना शेवटची परिक्षा दिल्यापासून ६० दिवसांत रुजू करुन घावे. सदर वैद्यकीय अधिकारी यांना रुजू करुन घेतांना ते नेमके पदव्युत्तर पदवी / पदविका अभ्यासक्रमासाठी गेले होते किंवा कसे याबाबत संबधित जिल्हा आरोग्य अधिकारी व संबंधित जिल्हा शल्य चिकित्सक यांनी खात्री करुन घेवून केवळ पदव्युत्तर पदवी / पदविका अभ्याक्रमासाठी विनापरवानगी गैरहजर असलेल्या वैद्यकीय अधिकाऱ्यांना रुजू करुन घेण्याची कार्यवाही संबंधित जिल्हा आरोग्य अधिकारी व संबंधित जिल्हा शल्य चिकित्सक यांनी करावी.

५. तसेच कोणत्याही कर्मचा-याची ५ वर्षाच्या आतील गैरहजेरीबाबत निर्णय घेण्याचे अधिकार विभागास आहे तसेच, महाराष्ट्र नागरी सेवा (रजा) नियम १९८१ मधील नियम १६ नुसार एखाद्या प्रकरणातील अपवादात्मक परिस्थिती विचारात घेवून शासनाने अन्यथा निर्णय दिला असल्याखेरीज कोणत्याही शासकीय कर्मचा-याला सतत पाच वर्षाहून अधिक कालावधीकरिता कोणत्याही प्रकारची रजा मंजूर केली जाणार नाही अशी तरतूद आहे. महाराष्ट्र नागरी सेवा (रजा) नियम १९८१ मधील नियम १६ मधील तरतूद पाहता, कोणत्याही कर्मचा-याची ५ वर्षापेक्षा अधिक कालावधीतील गैरहजेरीबाबत निर्णय घेण्यासाठी वित्त विभागाची मान्यता घेणे आवश्यक आहे. सदर बाब विचारात घेता ५ वर्षापर्यत अनधिकृत गैरहजर असलेल्या वैद्यकीय अधिका-यांना विभागाच्या स्तरावर रुजू करुन घेता येईल तथापी, ५ वर्षापेक्षा अधिक कालावधीसाठी गैरहजर असलेल्या वैद्यकीय अधिका-यांना सेवेत पुन्हा रुजू करुन घ्यावयाचे झाल्यास वित्त विभागाची मान्यता घेणे क्रमप्राप्त आहे. सबब ५ वर्षापेक्षा अधिक कालावधीसाठी अनधिकृत गैरहजर असलेल्या वैद्यकीय अधिका-यांना कोणत्याही परिस्थितीत रुजू करुन घेण्यात येवू नये.

६. पदव्युत्तर पदवी / पदविका अभ्यासक्रमासाठी विनापरवानगी गैरहजर असलेल्या वैद्यकीय अधिकाऱ्यांचा गैरहजेरीचा कालावधी हा प्रकरणपरत्वे विचार करुन त्यांचा विनापरवानगी गैरहजेरीचा

कालावधी हा त्यांनी दिलेल्या कारणाचा व त्या अनुषंगाने सादर केलेल्या कागदोपत्री पुराव्याचे आधारे तो कालावधी अनधिकृत गैरहजरी, असाधारण रजा (विनावेतन), यामधून कसा नियमित करावयाचा त्याबाबत वित्त विभागाच्या दिनांक १० ऑक्टोंबर, २०१७ च्या शासन निर्णयातील तरतुदी तसेच म.ना.से. (सेवानिवृत्ती) नियम,१९८२, म.ना.से. (रजा) नियम,१९८१, यामधील तरतुदी विचारात घेवून आयुक्त, आरोग्य सेवा आयुक्तालय, मुंबई यांच्याकडून प्रकरणपरत्वे तसा ठोस सविस्तर प्रस्ताव शासनास सादर करावा. **सदर गैरहजेरीचा कालावधी नियमित होईपर्यत अनधिकृत गैरहजर वैद्यकीय अधिका-यांना पुढील वेतनवाढ देण्यात येऊ नये**.

७. उक्त सर्व बाबी विचारात घेता, पदव्युत्तर पदवी / पदविका अभ्यासक्रम पुर्ण केल्यानंतर शासन सेवेत रुजू होण्याची संधी देऊनही जे विनापरवानगी गैरहजर वैद्यकीय अधिकारी रुजू होणार नाहीत त्यांना त्यांच्या वैयक्तीक कारणास्तव वारंवार दीर्घकालीन विनापरवागी गैरहजर राहण्याची त्यांची वृत्ती असल्याने त्यांना शासन सेवेत स्वारस्य नाही असे गृहीत धरुन ते महाराष्ट्र नागरी सेवा (शिस्त व अपिल) नियम, १९७९ मधील नियम १३ (२) प्रमाणे ते कारवाईस पात्र ठरतील व त्यानुसार प्रस्तुत प्रकरणी त्यांना रुजू होण्यास कळविण्यात येणारे शासन आदेश हेच त्यांची महाराष्ट्र नागरी सेवा (शिस्त व अपिल) नियम, १९७९ मधील नियम १३ (२) नुसार त्यांची सेवा समाप्तीची नोटीस समजून त्यांची सेवा समाप्त करण्याची कार्यवाही करण्यात यावी.

८. सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२११२१४१५५५३७७६१७ असा आहे. सदर शासन आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

LAHANE VIJAYKUMAR LAXMANRAO

Digitally signed by LAHANE VIJAYKUMAR LAXMANRAO
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PLANNING DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=047af7706d4845170e3864b62c8bc6b380c78f11ce6607746c0b15e934fc8284, pseudonym=91CF303CCF98AAFBC28FD87C6A71DA717A6A7250, serialNumber=8902AEDC74F3CACF3FB967FF5955AAF5DCBFDD2C053872C04B5E4671EF77EC30, cn=LAHANE VIJAYKUMAR LAXMANRAO
Date: 2021.12.16 12:57:10 +05'30'

**(वि.ल.लहाने)**

**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रति,

१) आयुक्त, आरोग्य सेवा आयुक्तालय, मुंबई

२) संचालक, आरोग्य सेवा आयुक्तालय, मुंबई

३) सर्व उपसंचालक, आरोग्य सेवा परिमंडळे.
४) सर्व जिल्हा आरोग्य अधिकारी.
५) सर्व जिल्हा शल्यचिकित्सक.
६) सर्व वैद्यकीय अधिक्षक.
७) प्र.स. (सा.आ.) १ व २ यांचे स्वीय सहायक, सा.आ.वि. मंत्रालय, मुंबई.
८) निवडनस्ती सेवा-३